भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदे सरळसेवेने भरताना अनुसरावयाची कार्यपध्दती...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक: प्रानिमं १२१६/(प्र.क्र.६५/१६)/१३-अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: १३ जून, २०१८

वाचा: -

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं ३०८९/प्र.क्र.६९/१३-अ, दिनांक ०५ मे, १९८९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं ३०९९/प्र.क्र.६९/१३-अ, दिनांक ११.०६.१९९९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-०६/प्र.क्र.१७१/१२, दिनांक १७.०२.२००७
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं-२००७/प्र.क्र.४६/१३-अ, दिनांक १९.१०.२००७
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं २००७/ प्र.क्र.४६/१३-अ, दिनांक २७ जून, २००८
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं २०१०/प्र.क्र.६६/१३-अ, दिनांक १९ जून, २०१०
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं १०११/प्र.क्र.९९/१३-अ, दिनांक २६ डिसेंबर, २०११
८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं १२१४/प्र.क्र.४३/१३-अ, दिनांक ०५ जून, २०१४
९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं १२१४/प्र.क्र.१०८/१३-अ, दिनांक ११ मार्च, २०१५
१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं१२१५/प्र.क्र.५५/१३-अ, दिनांक ०५ ऑक्टोबर, २०१५
११) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), क्र.मातंसं-०८८/२७/२०१६-DIR IT (MH), दिनांक १९ सप्टेबर, २०१७
१२) शासन पूरकपत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं१२१७/प्र.क्र.९२/१३-अ, दिनांक ०२ डिसेंबर, २०१७
१३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं१२१८/प्र.क्र.२७/१३-अ, दिनांक १४ मार्च, २०१८

**प्रस्तावना: -**

राज्य शासनाच्या दुय्यम सेवेतील गट “क” मधील उमेदवारांची निवड करण्यासाठी स्थापन करण्यात आलेली सहा प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे व महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई ही कार्यालये दि.११/०६/१९९९ रोजी शासनाने बरखास्त केल्यानंतर भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क पदे सरळसेवेने भरताना अनुसरावयाची कार्यपद्धती संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली असून सदर कार्यपद्धती संदर्भाधीन क्र.५ ते १२ येथील शासन निर्णय/परिपत्रकांन्वये वेळोवेळी सुधारित करण्यात आली आहे. सदर पदांच्या भरतीसंदर्भात वरीलप्रमाणे वेगवेगळे आदेश अस्तित्वात असल्यामुळे नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून व विविध निवड समित्यांकडून वेगवेगळी कार्यपध्दती अनुसरली जाणे शक्य आहे. तसेच, सदरच्या कामात एकसूत्रता, नि:पक्षपातीपणा व समान दर्जा राखणे आणि उमेदवारांना समान संधी उपलब्ध करुन देणे आवश्यक असल्यामुळे पदभरतीच्या कार्यपद्धतीसंदर्भात एकत्रित आदेश निर्गमित करावयाचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय: -**

भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत येणारी पदे तसेच, ज्या विशिष्ट संवर्गातील पदांच्या भरतीसाठी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून स्वतंत्र कार्यपद्धती निश्चित करण्यात आली आहे, उदा. पोलीस शिपाई, शिक्षणसेवक इत्यादि, अशी पदे वगळून) सरळसेवेने भरण्यात येणारी गट-ब (अराजपत्रित) व गट-क च्या पदांच्या भरतीची एकत्रित कार्यपद्धती खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे: -

२. **निवड समित्यांची स्थापना.**

**अ) जिल्हा निवड समिती: -** जिल्हास्तरीय पदे भरण्याकरिता जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे जिल्हा निवड समितीची रचना करण्यात यावी: -

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ३) | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी | सदस्य |
| ४) | जिल्हा समाजकल्याण अधिकारी सदस्य | |
| ५) | जिल्हा आदिवासी विकास अधिकारी | सदस्य |
| ६) | जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी सदस्य | |
| ७) | ज्या कार्यालय/विभागातील पदे भरावयाची आहेत त्या कार्यालयाचे/विभागाचे प्रमुख अथवा त्यांचे गट अ मधील प्रतिनिधी | सदस्य |

(सामायिक संवर्गातील उदा: लिपिक-टंकलेखक, वरीष्ठ लिपिक, वाहनचालक इ. पदांवर भरती करताना अ.क्र.७ येथील सदस्याचा समितीमध्ये समावेश असणार नाही.)

वरीलप्रमाणे स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा निवड समितीमध्ये जिल्हाधिकारी यांच्या अधिपत्याखालील गट “अ” मधील एका अधिकाऱ्याची सदस्य सचिव म्हणून जिल्हाधिकारी यांनी नियुक्ती करावी. तसेच, जिल्हा परिषदेमधील रिक्त पदांवरील भरतीची कार्यवाही करताना मुख्य कार्यकारी अधिकारी यांची शिफारस विचारात घेऊन जिल्हाधिकारी यांनी जिल्हा परिषदेतील गट “अ” मधील एका अधिकाऱ्याची सदस्य सचिव म्हणून नियुक्ती करावी.

**ब) प्रादेशिक व राज्य स्तरीय निवड समित्या: -**

१) प्रादेशिक व राज्यस्तरीय गट-ब (अराजपत्रित) व गट क पदांवर उमेदवारांची निवड करण्याकरिता सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी प्रादेशिक विभाग प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवड समित्या व विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन करण्याचे आदेश निर्गमित करावेत.

२) संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने अशा समित्यांवर सदस्य सचिव म्हणून गट “अ” मधील एका योग्य अधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

उपरोक्त जिल्हास्तरीय, प्रादेशिक व राज्यस्तरीय निवड समित्यांवर अ.जा./अ.ज./इ.मा.व. यामधून एका प्रतिनिधीची व अल्पसंख्यांकामधून एका प्रतिनिधीची नियुक्ती करण्यात यावी. तसेच अशा निवड समितीमध्ये, सर्वसाधारण किंवा उपरोक्त प्रवर्गापैकी कोणत्याही प्रवर्गामधील एक प्रतिनिधी महिला असणे अनिवार्य आहे. निवड समिती गठित करताना वरील अटींची पूर्तता होत नसल्यास निवड समितीमध्ये अतिरिक्त सदस्याची नियुक्ती करुन सदर अटींची पूर्तता करण्यात यावी. गट “अ” मधील अल्पसंख्यांक अधिकारी उपलब्ध होत नसल्यास गट-“ब” (राजपत्रित) अल्पसंख्यांक अधिकाऱ्याचा निवड समितीमध्ये समावेश करण्यात यावा. मात्र निवड समितीमधील अन्य कोणताही सदस्य गट अ स्तरापेक्षा कमी स्तरावरील नसावा.

**३. निवड समित्यांसाठी निवड प्रक्रियेचा कालबध्द कार्यक्रम: -**

१) जिल्हा निवड समितीस निश्चित कालावधीत उमेदवारांची शिफारस करणे शक्य व्हावे म्हणून सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्त्याखालील विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुखांनी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयानुसार आपल्या अधिपत्त्याखालील जिल्हास्तरीय पदांचा नियमित आढावा घेऊन सरळसेवेने भरती करावयाची रिक्त पदे निश्चित करुन या आदेशासोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविल्यानुसार विहित मुदतीत संबंधित जिल्हा निवड समितीकडे मागणीपत्र पाठविण्याची दक्षता घ्यावी व जिल्हा निवड समित्यांनी परिशिष्ट “अ” मध्ये निश्चित केल्यानुसार विहित कालावधीत निवड प्रक्रियेची कार्यवाही करावी.

२) वरीलप्रमाणे कार्यवाही करताना नियुक्ती प्राधिकारी **(जिल्हा परिषदा वगळून उर्वरित)** यांनी त्यांच्या अधिपत्त्याखालील कार्यालयात पुढील कॅलेंडर वर्ष अखेरपर्यंत म्हणजेच डिसेंबर अखेरपर्यंत किती जिल्हास्तरीय पदे नामनिर्देशनाने

भरतीसाठी उपलब्ध होतील (उदा. १५ जून २०१८ पूर्वी मागणीपत्र पाठविताना दि.०१ जानेवारी, २०१९ ते दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यंतची याप्रमाणे दरवर्षी सेवानिवृत्ती, पदोन्नती, राजीनामा इ. कारणांमुळे रिक्त असलेली/होणारी पदे) यांचा अंदाज घेऊन दरवर्षी १५ जूनपर्यंत जिल्हा निवड समितीकडे मागणीपत्र पाठवावे.

३) राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमधील गट-ब (अराजपत्रित) व गट-क ची पदे दरवर्षी नियमितपणे भरली जातील यासाठी कालबद्ध कार्यक्रम निश्चित करण्याची जबाबदारी ग्रामविकास व जलसंधारण विभागाची राहील. तसेच असा भरती कार्यक्रम दरवर्षी जूनपूर्वी सुरू होऊन निवड प्रक्रिया त्याच वर्षाच्या डिसेंबर अखेरपर्यंत पूर्ण होईल अशा प्रकारे निश्चित करण्यात येईल. जिल्हा परिषदेने जिल्हा निवड समितीकडे मागणीपत्र न पाठविता जिल्हा परिषदांमधील रिक्त पदे भरण्याबाबत दरवर्षी ग्रामविकास व जलसंधारण विभागाकडून निश्चित करण्यात येणाऱ्या कालबद्ध कार्यक्रमानुसार जिल्हा निवड समितीच्या मान्यतेने निवड प्रक्रियेची संपूर्ण कार्यवाही करावी. असे करताना वरील परिच्छेद क्र.३ (२) प्रमाणे उपलब्ध होणारी रिक्त पदे विचारात घेण्यात यावी.

४) या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” मधील कालबद्ध कार्यक्रमाच्या अधीन राहून संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) यांनी संबंधित महसूल विभागाकरीता (जिल्हा परिषदा वगळून) गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील सर्व जिल्हास्तरीय पदांकरिता लेखी परीक्षा एकाच दिवशी घेण्याच्या दृष्टीने एकत्रित कार्यक्रम निश्चित करावा.

५) या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.९ येथील तरतुदी विचारात घेऊन शासकीय पदांसाठी प्रश्नपत्रिका व आदर्श उत्तरपत्रिका तयार करवून घेण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांची राहील. तसेच, जिल्हा परिषदेच्या पदांबाबतदेखील प्रश्नपत्रिका व आदर्श उत्तरपत्रिका तयार करवून घेण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांची राहील. परंतु, परीक्षा घेण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांची राहील. त्याकरिता संदर्भ क्र.११ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), दिनांक १९/०९/२०१७ मधील निर्देशांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी स्थापन केलेल्या प्रादेशिक व राज्य स्तरीय निवड समित्यांनी सेवाभरतीची जाहिरात ज्या महिन्यात दिली जाईल त्या महिन्यापासून पुढील एका वर्षात नामनिर्देशनाने भरतीसाठी उपलब्ध होणाऱ्या संभाव्य रिक्त पदांची संख्या विचारात घेऊन निवड प्रक्रिया करावी. ( उदा. जुलै, २०१८ मध्ये जाहिरात दिल्यास ३० जून, २०१९ पर्यंत सेवानिवृत्ती, पदोन्नती, राजीनामा इ. मुळे रिक्त होणारी पदे.)

**४. रिक्त पदांबाबतची जाहिरात विविध पध्दतीने करण्याबाबत: -**

१) रिक्त पदांची जाहिरात वृत्तपत्रांमधून देण्यात यावी. त्याकरिता संबंधित क्षेत्रामधील अधिक खप असलेल्या वर्तमानपत्रांमध्ये, Employment Exchange/रोजगार समाचार इत्यादि रोजगारविषयक वृत्तपत्रांमध्ये जाहिरात देण्यात यावी व त्यापैकी किमान एक वृत्तपत्र मराठी असावे. सदर जाहिरात माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत देणे अनिवार्य राहील.

२) याशिवाय सदर जाहिरात केंद्र शासनाच्या कामगार व रोजगार मंत्रालयाच्या National Carrier Service या पोर्टलवर प्रसिद्ध करण्यात यावी. राज्य शासनाच्या कौशल्य विकास व उद्योजकता विभागातंर्गत असलेल्या संबंधित जिल्ह्यातील/प्रादेशिक विभागातील कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्रांनादेखील रिक्त पदांची माहिती देण्यात यावी, जेणेकरून त्यांच्यामार्फत त्यास समुचित प्रसिद्धी दिली जाईल.

३) तसेच, रिक्त पदांची जाहिरात संबंधित निवड समिती प्रमुखांच्या व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या कार्यालयांच्या दर्शनी जागेतील सूचना फलकांवर (नोटीस बोर्ड) तसेच अधिकृत संकेतस्थळांवर प्रसिद्ध करण्यात यावी.

**५. स्पर्धा परीक्षांसाठी "महापरीक्षा पोर्टल" चा वापर करणेबाबत: -**

१) रिक्त पदभरतीप्रक्रिया राबविताना संबंधित जिल्हा निवड समित्या, प्रादेशिकस्तरीय निवड समित्या तसेच राज्यस्तरीय निवड समित्यांनी स्पर्धा परीक्षांसाठी "महापरीक्षा पोर्टल" चा वापर करावा. याकरिता संबंधित निवड समित्यांना समन्वय समिती (Nodal Agency) म्हणून तसेच निवड समितीच्या अध्यक्षांना/सदस्य सचिवांना समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी संदर्भ क्र.११ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), दिनांक १९/०९/२०१७ व त्यासोबतच्या परिशिष्ट क्र.१ ते ४ मधील निर्देशांनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

२) तसेच, उक्त दि.१९/०९/२०१७ च्या शासन निर्णयान्वये महापरिक्षा पोर्टलच्या वापरासाठी विहित केलेल्या दरांनुसार निवड समित्यांच्या अध्यक्षांनी (विभाग प्रमुख/प्रादेशिक विभाग प्रमुख/जिल्हाधिकारी यांनी) त्यांच्याशी संबंधित संपूर्ण निवडप्रक्रिया पार पाडण्यासाठी होणाऱ्या एकूण अंदाजित खर्चाची परिगणना करून त्यानुसार त्यांच्या कार्यालयीन अंदाजपत्रकात पुरेशी वाढीव आर्थिक तरतूद करावी आणि मंजूर अनुदानातून सदर खर्च भागविण्याची दक्षता घ्यावी.

३) उक्त दि.१९/०९/२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार केल्या जाणाऱ्या कार्यवाहीसंदर्भात काही आक्षेप उद्भवल्यास, त्याचे निराकरण करण्याची जबाबदारी, जी कार्यवाही महापरीक्षा पोर्टलच्या अखत्यारित येत असेल त्याबाबतीत महापरीक्षा कक्षाची राहील आणि जी कार्यवाही

संबंधित जिल्हा निवड समिती/प्रादेशिकस्तरीय निवड समिती/राज्यस्तरीय निवड समितीच्या अखत्यारित येत असेल त्याबाबतीत संबंधित निवड समितीची राहील.

४) "महापरीक्षा पोर्टल" च्या प्रत्यक्ष वापरासाठी/त्यासंबंधातील शंकांच्या निरसनासाठी महाआयटी महामंडळाद्वारे स्थापित महापरीक्षा कक्षाच्या प्रकल्प व्यवस्थापकांशी पुढील ई-मेल आयडी वर संपर्क करावा: -

(i) Project Manager-1, Maha Pariksha Cell: pm1.mahapariksha@mahait.org

(ii) Project Manager-2, Maha Pariksha Cell: pm2.mahapariksha@mahait.org

**६. अर्जासोबत आकारण्याच्या शुल्काबाबत:-**

उमेदवारांकडून अर्जासोबत पुढीलप्रमाणे परीक्षा शुल्क आकारण्यात यावे: -

| **खुला प्रवर्ग** | **राखीव प्रवर्ग** |
|---|---|
| **रु.३००/-** | **रु.१५०/-** |

सदर शुल्क ऑनलाईन पद्धतीने/राष्ट्रीयीकृत बँकेमध्ये चलनाद्वारे/नागरी सुविधा केंद्रामध्ये पावतीद्वारे इत्यादिपैकी कोणत्या स्वरूपात स्विकारावे याबाबतचा निर्णय संबंधित निवड समितीने घ्यावा व तसा स्पष्ट उल्लेख जाहिरातीमध्ये करावा. सदर शुल्काची सर्व रक्कम शासनाच्या एकत्रित निधीमध्ये (जमा शीर्षाखाली) जमा करण्यात यावी व सदर जमा रक्कमेच्या नोंदी स्वतंत्र नोंदवहीत करण्याची दक्षता निवड समितीने घ्यावी.

**७. लेखी परीक्षा घेण्याबाबत: -**

**१) गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील कोणत्याही पदासाठी उमेदवारांची निवड करताना मौखिक परीक्षा (मुलाखती) घेऊ नये.**

२) खालील अ.क्र. (३) व (४) वगळता, गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील अन्य सर्व पदांकरीता उमेदवारांची निवड करतांना २०० गुणांची लेखी परीक्षा घेण्यात यावी. अशा परीक्षेमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे एकूण गुणांच्या किमान ४५% गुण मिळवणाऱ्या उमेदवारामधून निवडसूची तयार करून निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्यात यावी.

३) ज्या पदांसाठी लेखी परीक्षा व शारिरीक चाचणी (Physical Test)/व्यावसायिक चाचणी (Proficiency Test) घेणे आवश्यक असेल अशा पदांसाठी १२० गुणांची लेखी परीक्षा व ८० गुणांची शारिरीक चाचणी/व्यावसायिक चाचणी घेण्यात यावी. तथापि, जे उमेदवार लेखी परीक्षेत किमान ४५% गुण प्राप्त करतील अशा उमेदवारांनाच शारिरीक चाचणी/व्यावसायिक चाचणी देता येईल. लेखी परीक्षा व शारिरीक चाचणी/व्यावसायिक चाचणी यांमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे निवडसूची तयार करून निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्यात यावी.

४) शालांत परीक्षा उत्तीर्णपेक्षा कमी अर्हता आवश्यक असलेल्या उदा. सुतार, गवंडी, वाहनचालक इत्यादि संवर्गातील पदांसाठी व्यावसायिक चाचणी, आवश्यक तेथे शारिरीक क्षमतेची चाचणी घेणे आवश्यक असल्यामुळे अशा उमेदवारांची निवड करताना ६० गुणांची व्यावसायिक चाचणी व आवश्यक तेथे ४० गुणांची शारिरीक क्षमतेची चाचणी घेवून यांमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे निवडसूची तयार करून निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्यात यावी. ज्या पदांसाठी शारीरिक क्षमतेची चाचणी घेण्याची आवश्यकता नाही अशा पदांसाठी १०० गुणांची व्यावसायिक चाचणी घेवून यांमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे निवडसूची तयार करून निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्यात यावी.

५) वरील अ. क्र. २) ते ४) नुसार कार्यवाही करताना गुणवत्ता यादीत अंतर्भाव करण्यासाठी उमेदवाराने **एकूण गुणांच्या किमान ४५% गुण प्राप्त करणे आवश्यक** राहील.

## ८. आवश्यकतेनुसार चाळणी परीक्षा घेणेबाबत: -

१) ज्या पदांसाठी व्यावसायिक चाचणी घेणे आवश्यक असते आणि अशा पदांच्या भरतीकरीता जेव्हा मोठ्या संख्येने अर्ज प्राप्त होतात आणि तितक्या उमेदवारांची व्यावसायिक चाचणी घेणे शक्य/व्यवहार्य नसते तेव्हा उमेदवारांची संख्या मर्यादित होण्याकरिता व अधिक सक्षम उमेदवार उपलब्ध होण्याकरिता संबंधित निवड समिती चाळणी लेखी परीक्षेचा पर्याय निवडू शकेल. मात्र अशा प्रकारची परिस्थिती निर्माण झाल्यास चाळणी परीक्षा घेण्याचा निर्णय घेतला जाऊ शकेल असा स्पष्ट उल्लेख जाहिरातीमध्ये करणे आवश्यक राहील. अशा चाळणी परीक्षेतील प्रश्नांचे स्वरुप वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरुपाचे असावे. चाळणी परिक्षेमधील प्रश्नांचा स्तर/दर्जा संबंधित पदाकरिता विहित करण्यात आलेल्या किमान शैक्षणिक अर्हतेनुसार तसेच, संबंधित पदासाठी आवश्यक असलेल्या कौशल्य तपासणीस पूरक असावा. तसेच, अशा संभाव्य चाळणी परीक्षेच्या अभ्यासक्रमाविषयीची संक्षिप्त माहिती, प्रश्नांचा प्रकार व प्रश्नसंख्या इत्यादि बाबी देखील निवड समितीने जाहिरातीमध्ये नमूद करणे आवश्यक राहील.

२) या चाळणी परीक्षेतून “प्रवर्गनिहाय रिक्त पदांच्या संख्येच्या चौपट” या प्रमाणात पात्र ठरणाऱ्या उच्चतर गुणवत्ताधारक उमेदवारांची व्यावसायिक चाचणी घेवून यांमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे प्रवर्गनिहाय निवडसूची तयार करून निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार शिफारस करण्यात यावी. तथापि, सदर चाळणी परीक्षा ही फक्त उमेदवारांची संख्या मर्यादित/कमी करण्यासाठी असून सदर परीक्षेमध्ये मिळालेल्या गुणांचा विचार अंतिम निवडसूची तयार करताना करण्यात येऊ नये.”

## ९. लेखी परीक्षा: -

### (अ) लेखी परीक्षेचे स्वरुप: -

१) ज्या पदांसाठी फक्त लेखी परीक्षा घेऊन निवड करावयाची आहे अशा पदांसाठी मराठी, इंग्रजी, सामान्य ज्ञान व बौध्दिक चाचणी या विषयांवरील प्रश्नांकरिता प्रत्येकी ५० गुण ठेवून एकूण २०० गुणांची लेखी परीक्षा घेऊन निवड करण्यात यावी.

२) ज्या पदांसाठी लेखी परीक्षा व शारिरिक चाचणी/व्यावसायिक चाचणी (Proficiency Test) घेणे आवश्यक असेल अशा पदांसाठी मराठी, इंग्रजी, सामान्य ज्ञान व बौध्दिक चाचणी या विषयांवरील प्रश्नांकरिता प्रत्येकी ३० गुण ठेवून एकूण १२० गुणांची लेखी परीक्षा घेण्यात यावी.

३) लेखी परीक्षेच्या प्रश्नपत्रिका वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरुपाच्या असतील. प्रश्नपत्रिकेतील प्रत्येक प्रश्नास जास्तीत जास्त २ गुण ठेवण्यात येतील.

४) जिल्हास्तरीय पदांसाठी निवड होणाऱ्या उमेदवारांना संबंधित जिल्हयाचा भूगोल, सामाजिक इतिहास, हवामान इ.स्थानिक बाबींची/वैशिष्ट्यांची माहिती असणे आवश्यक आहे. यास्तव सामान्य ज्ञान या विषयाची प्रश्नपत्रिका तयार करताना सदर बाब विचारात घेण्यात यावी.

### (ब) लेखी परीक्षेचा दर्जा/स्तर: -

१) लेखी परीक्षेतील प्रश्नांचा स्तर हा त्या त्या पदांच्या सेवाप्रवेश नियमांमध्ये विहित करण्यात आलेल्या किमान शैक्षणिक अर्हतेच्या दर्जापेक्षा निम्न नसावा.

२) ज्या पदांकरिता पदवी ही कमीतकमी अर्हता आहे अशा पदांकरिता परीक्षेचा दर्जा भारतातील मान्यताप्राप्त विद्यापीठांच्या पदवी परीक्षेच्या दर्जाच्या समान राहील. परंतु त्यापैकी मराठी व इंग्रजी या विषयांच्या प्रश्नपत्रिकेचा दर्जा उच्च माध्यमिक शालांत परीक्षेच्या (इयत्ता १२ वी) दर्जाच्या समान राहील.

## १०. काळ्या शाईच्या बॉलपॉईंट पेनाचा वापर करणेबाबत: -

लेखी परीक्षांकरिता जेथे उमेदवाराने उत्तर पत्रिकेवर पेनाचा वापर करणे अपेक्षित आहे तेथे, (उदा. बैठक क्रमांक, परिक्षेसंबंधी इतर तपशिलाच्या लिखाणाकरिता, उत्तराच्या चिन्हांकरिता इ.) **केवळ काळ्या शाईच्या बॉलपॉईंट पेनाचा वापर करणे आवश्यक** आहे; ही बाब संबंधित निवड समितीने उमेदवारांना लेखी परीक्षेसाठी प्रवेशपत्रे पाठवितांना उमेदवारांच्या निदर्शनास आणावी.

## ११. उमेदवारांना समान गुण मिळाल्यास: -

"लेखी परीक्षेचा निकाल तयार करताना परीक्षेत ज्या पात्र उमेदवारांना समान गुण असतील अशा उमेदवारांचा गुणवत्ता यादीमधील प्राधान्यक्रम पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात यावा:-

१) आत्महत्याग्रस्त शेतकऱ्याच्या पाल्यास प्रथम प्राधान्य राहील.

२) समान गुणप्राप्त उमेदवारांमध्ये आत्महत्याग्रस्त शेतकऱ्याचा पाल्य नसेल अथवा वरील अनु. क्र. १ नुसार एकापेक्षा अधिक उमेदवार समान गुणप्राप्त असतील तर त्यापैकी वयाने ज्येष्ठ असलेल्या उमेदवारास प्राधान्य देण्यात यावे.

३) वरील अनु. क्र. १ व २ या दोन्ही अटींमध्ये देखील समान ठरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत, अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास उच्चतर शैक्षणिक अर्हता (पदव्युत्तर पदवीधर, पदवीधर, उच्च माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण, माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण अशा प्रकारे) धारण करणाऱ्या उमेदवारास प्राधान्यक्रम देण्यात यावा.

४) वरील अनु. क्र. १, २ व ३ या तिन्ही अटींमध्ये देखील समान ठरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत, सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये विहित असलेल्या किमान शैक्षणिक अर्हतेमध्ये उच्चतर गुण प्राप्त उमेदवारास प्राधान्यक्रम देण्यात यावा."

(**टीप**: आत्महत्याग्रस्त शेतकऱ्याचा पाल्य म्हणजे शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७, दिनांक २३ जानेवारी, २००६ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीने ज्या कुटुंबास शेतकऱ्याच्या आत्महत्याप्रकरणी मदतीसाठी पात्र ठरविले असेल अशा कुटुंबातील मृत शेतकऱ्याचा पाल्य (पत्नी/मुलगे/मुलगी) होय.)

## १२. निवडसूचीत समाविष्ट करावयाच्या उमेदवारांची संख्या: -

निवडसूची ही प्रवर्गनिहाय तयार करण्यात यावी व त्यामध्ये समाविष्ट करावयाच्या उमेदवारांची संख्या पुढीलप्रमाणे असावी: -

| **प्रवर्गनिहाय रिक्त पदांची संख्या** | **निवडसूचीमध्ये समाविष्ट करावयाच्या उमेदवारांची संख्या** |
|---|---|
| १ | **३** |
| २ ते ४ | रिक्त पदे अधिक रिक्त पदांच्या **१०० टक्के** किंवा **५** यापैकी जे अधिक असेल ते. |
| ५ ते ९ | रिक्त पदे अधिक रिक्त पदांच्या **५० टक्के** किंवा **१०** यापैकी जे अधिक असेल ते. |

| | |
|---|---|
| १० ते ४९ | रिक्त पदे अधिक रिक्त पदांच्या **३० टक्के** किंवा **१५** यापैकी जे अधिक असेल ते. |
| ५० किंवा याहून अधिक | रिक्त पदे अधिक रिक्त पदांच्या **२५ टक्के**. |

वरीलप्रमाणे अतिरिक्त उमेदवारांच्या संख्येची परिगणना करताना उमेदवारांची संख्या अपूर्णांकात येत असल्यास पुढील पूर्णांक संख्या विचारात घेण्यात यावी.

**१३. निवडसूचीची कालमर्यादा: -**

१) निवड समितीने तयार केलेली निवडसूची १ वर्षासाठी किंवा निवडसूची तयार करताना ज्या दिनांकापर्यंतची रिक्त पदे विचारात घेण्यात आली आहेत त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे नंतर घडेल त्या दिनांकापर्यंत विधीग्राह्य राहील. त्यानंतर ही निवडसूची व्यपगत होईल.

२) निवड समितीने तयार केलेल्या निवडसूचीमधून ज्येष्ठतेनुसार उमेदवारांची नियुक्तीसाठी शिफारस केल्यानंतर शिफारस केलेला उमेदवार सदर पदावर विहित मुदतीत रूजू न झाल्यास किंवा संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार, किंवा जात प्रमाणपत्र/अन्य आवश्यक प्रमाणपत्रांची अनुपलब्धता/अवैधता किंवा अन्य कोणत्याही कारणास्तव नियुक्तीसाठी पात्र ठरत नसल्याचे आढळून आल्यास अथवा शिफारस केलेला उमेदवार रुजू झाल्यानंतर नजिकच्या कालावधीत त्याने राजीनामा दिल्यामुळे किंवा त्याचा मृत्यू झाल्याने पद रिक्त झाल्यास, अशी पदे त्या त्या प्रवर्गाच्या निवडसूचीतील अतिरिक्त उमेदवारांमधून वरिष्ठतेनुसार उतरत्या क्रमाने भरण्यात यावीत. मात्र, अशी कार्यवाही निवडसूचीच्या कालमर्यादेत करण्यात यावी.

**१४. मानधन:** - स्पर्धा परीक्षांच्या संनियंत्रणासाठी जो कर्मचारीवृंद नेमावा लागणार आहे अशा कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून ज्या दराने मानधन देण्यात येते त्याच दराने मानधन अनुज्ञेय राहील.

१५. संपूर्ण निवड प्रक्रियेच्या कामाकरिता होणाऱ्या खर्चासाठी विभागप्रमुख/प्रादेशिक विभागप्रमुख/जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयाच्या अंदाजपत्रकात पुरेशी तरतूद करावी व मंजूर केलेल्या अनुदानातूनच सदर खर्च भागविण्याची दक्षता घ्यावी.

१६. निवड समितीचे सर्व निर्णय निवड समितीकडून अभिलिखित करण्यात यावेत.

१७. या एकत्रित आदेशांच्या परिणामी संदर्भाधीन क्र. १, क्र.४ ते १० व क्र.१२ येथील शासन आदेश रद्द करण्यात येत आहेत.

१८. हे आदेश सदर शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापासून तात्काळ अंमलात येतील. परंतु, ज्या प्रकरणी हे आदेश निर्गमित होण्यापूर्वी जाहीरात प्रसिद्ध करुन निवडप्रक्रिया सुरु करण्यात आली आहे, अशा प्रकरणी हे आदेश लागू होणार नाहीत. सदर प्रकरणी प्रचलित आदेशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१९. सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील आदेश त्यांच्या प्रशासकीय अधिपत्त्याखालील सर्व कार्यालयांना/नियुक्ती प्राधिकाऱ्यांना कळवावे आणि या आदेशांची काटेकोर अंमलबजावणी केली जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

२०. या आदेशान्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार करावयाच्या पदभरतीची जबाबदारी संबंधित निवड समितीची राहील. प्रादेशिक व राज्यस्तरीय पदभरतीबाबतच्या संनियंत्रणाची जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची तसेच, जिल्हास्तरीय पदांच्या भरतीबाबतच्या संनियंत्रणाची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्तांची राहील.

तसेच, स्पर्धा परीक्षेच्या आयोजनासंदर्भात काही अडचणी/वाद उद्भवल्यास त्यांचे निराकरण करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्प व्यवस्थापक, महापरीक्षा कक्ष, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांची राहील.

२२. गट-ड संवर्गातील सरळसेवा पदभरतीदेखील या शासन निर्णयातील निदेशांचा मार्गदर्शक स्वरुपात अवलंब करून राबविण्यात यावी.

२३. सरळसेवेच्या पदांवरील भरतीवर नियंत्रण आणण्यासाठी शासनाने त्या त्या वेळी घेतलेल्या निर्णयांच्या/आदेशांच्या अधीन राहून या शासन निर्णयातील निदेशांची अंमलबजावणी करण्यात यावी.

२४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१३१६१८१३२५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhatu Sambhu Wankhede

Digitally signed by Bhatu Sambhu Wankhede
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=493af62b137d3b8ad2fb93133b4b083c9cafb89b6793bfa8d7ebb7ba735e6d9d, serialNumber=454f1eaad82ae32f06775522a32735d46dc9a815a777254a802deaa980512d11, cn=Bhatu Sambhu Wankhede
Date: 2018.06.13 16:22:32 +05'30'

**(भ. सं. वानखेडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. संचालक (माहिती व तंत्रज्ञान संचालनालय)
९. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), उप सचिव (सा. प्र. वि./का.३९)
त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
१०. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१२. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१३. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१७. राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१८. सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
२०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
२१. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२७. मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२८. सर्व विभागीय आयुक्त,
२९. सर्व जिल्हाधिकारी,
३०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३१. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
३२. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
३३. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
३४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, वरळी, मुंबई १३(५ प्रती)
३५. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस समिती, टिळक भवन, मुंबई २५ (५ प्रती)
३६. नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती)
३७. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
३८. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख
३९. मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
४०. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
*पत्राने

**सन निर्णय सा.प्र.वि. क्रमांक: प्रानिमं १२१६/प्र.क्र.६५/१६/१३-अ, दि. १३ जून, २०१८ सोबतचे परिशिष्ट.**

# परिशिष्ट – अ

जिल्हास्तरीय रिक्त पदांवरील नेमणूका करण्यासाठी खालीलप्रमाणे कालबध्द कार्यक्रम निश्चित करण्यात येत आहे: -

| | | |
|---|---|---|
| अ) नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी जिल्हा निवड समितीकडे मागणीपत्र पाठविणे. | - | दरवर्षी १५ जून पर्यन्त |
| ब) जिल्हा निवड समितीने जाहिरात प्रसिध्द करणे | - | दरवर्षी जुलै महिन्यात |
| क) जिल्हा निवड समितीने लेखी परीक्षा/ व्यावसायिक चाचणी घेणे | - | दरवर्षी ऑक्टोबर महिन्यात |
| ड) निकाल व त्यानुसार निवडसूची जाहीर करणे | - | दरवर्षी नोव्हेंबर अखेरपर्यंत |

नियुक्ती प्राधिकारी यांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात किती जिल्हास्तरीय पदे नामनिर्देशनाने भरतीसाठी रिक्त आहेत व भरती वर्षात डिसेंबर अखेरपर्यन्त किती पदे रिक्त होतील (उदा.सेवानिवृत्ती, पदोन्नती इत्यादीमुळे) याचा अंदाज घेऊन दरवर्षी १५ जूनपर्यन्त प्रस्तुत शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-ब मध्ये दर्शविलेल्या विहित नमुन्यात जिल्हा निवड समितीकडे मागणीपत्र पाठवावे. तसेच मागणी निरंक असल्यास तसेही जिल्हा निवड समितीस कळविण्यात यावे.

नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी निवड समितीकडे मागणीपत्र पाठविण्याची मुदत संपताच जिल्हा निवड समितीने मागणी आलेल्या एकूण पदांची संवर्गनिहाय व प्रवर्गनिहाय संख्या निश्चित करुन पदांची जाहिरात विहित कालावधीत प्रसिध्द करण्याबाबत कार्यवाही करावी.

निवड समितीकडे विहित मुदतीनंतर प्राप्त झालेल्या मागणीपत्रांमधील मागणीवर पुढील वर्षाच्या कालबध्द कार्यक्रमानुसार विचार करण्यात यावा. परंतु संबंधित निवड समितीने ज्या संवर्गातील पदांसाठी अगोदरच कालबध्द कार्यक्रमानुसार जाहिरात प्रसिध्द केली असेल व त्याच संवर्गातील पदांचा दिनांक १५ जून नंतर परंतु लेखी परीक्षेच्या दिनांकाच्या लगतपूर्वीच्या महिन्याच्या अखेरपर्यन्त प्राप्त झालेल्या मागणीपत्रामध्ये समावेश असल्यास अशावेळी सदर मागणीपत्रामधील संबंधित संवर्गातील पदांचा समावेश निवड सूची तयार करण्यासाठी रिक्त  पदांची संख्या विचारात घेताना करण्यात यावा व मागणीपत्रातील उर्वरित संवर्गातील पदांचा पुढील वर्षाच्या कालबध्द कार्यक्रमानुसार विचार करण्यात यावा.

---------

**शासन निर्णय सा.प्र.वि. क्रमांक: प्रानिमं १२१६/प्र.क्र.६५/१६/१३-अ, दि.१३ जून, २०१८ सोबतचे परिशिष्ट.**

# परिशिष्ट – ब

उमेदवारांची भरती करण्यासाठी निवड समितीकडे पाठविण्याचा मागणीपत्राचा नमुना.

१) कार्यालय/विभाग आणि पत्ता :

२) पदाचे नाव :

३) नामनिर्देशनाने भरावयाच्या पदांची संख्या :

अ) स्थायी

ब) अस्थायी (असल्यास, किती कालावधीसाठी चालू राहील)

४) पदांच्या आरक्षणाचा तपशील :

| **प्रवर्ग** | | **पदसंख्या** | **महिला** | **अपंग** | **मा.सै.** | **खेळाडू** | **इतर** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ) अनुसूचित जाती व अनुसूचित जातीतील धर्मांतरीत बौध्द | : | | | | | | |
| ब) अनुसूचीत जमाती | : | | | | | | |
| क) वि.जा. (अ) | : | | | | | | |
| ड) भ.ज. (ब) | : | | | | | | |
| इ) भ.ज. (क) | : | | | | | | |
| फ) भ.ज. (ड) | : | | | | | | |
| च) इतर मागासवर्गीय | : | | | | | | |
| छ) विशेष मागास प्रवर्ग | : | | | | | | |
| ज) खुला | : | | | | | | |

**एकूण...**

५) पद ज्या वर्गातील व सेवेतील असेल तो वर्ग व ती सेवा

६) परीविक्षाधीन कालावधी, असल्यास (संबंधित पदाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये विहित असल्यास/शासन मान्यतेने स्वतंत्र्यपणे विहित केलेला असल्यास)

७) नोटीस देऊन नियुक्ती समाप्ती करण्यात येते काय, असल्यास, कोणत्या शर्तीवर?

८) (अ) कर्तव्ये

(ब) उमेदवारांना जेथे सेवा करावी लागेल त्या कार्यालयाचे ठिकाण/ठिकाणे

९) निवडण्यात आलेल्या उमेदवारांना कामावर केव्हा यावे लागेल?

१०) वेतनश्रेणी –

(अ) थेट सेवा प्रविष्ठांसाठी

(ब) किमान वेतनापेक्षा अधिक असणाऱ्या प्रारंभीच्या वेतनासाठी केलेली विनंती विचारात घेण्यात येईल काय, असल्यास, त्याची मर्यादा व कारणे?

११) नमूद करणे इष्ट असेल तर, पदोन्नतीच्या संधी

१२) आवश्यक अर्हता
(अ) शिक्षण
(ब) प्रशिक्षण
(क) अनुभव
(ड) कोणतीही इतर अर्हता
(ई) वरील (अ), (ब), (क) आणि (ड) यातील आवश्यक गोष्टींचे काटेकोरपणे पालन होणार आहे काय, नसल्यास, वरील बाबींच्या संबंधात शिथिलता किती प्रमाणात अनुज्ञेय असेल ते नमूद करण्यात यावे.
(फ) समान अर्हतेचा स्वीकार करता येईल काय, अशा अर्हता कोणत्या?
१३ वयोमर्यादा (कोणतीही असल्यास)
१४) राष्ट्रीयत्व
१५) वरील प्रश्नांच्या कक्षेत न आलेल्या कोणत्याही इतर शर्ती अथवा अर्हता

**मागणी पत्र पाठविणाऱ्या अधिकाऱ्याची सही व पदनाम**

**दिनांक:**
**स्थान:**

------